**नागपूर येथे विभागीय आयुक्त कार्यालय, जिल्हाधिकारी कार्यालय तसेच इतर शासकीय कार्यालयांच्या इमारतीचे एकत्रित बांधकाम करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- बीएलडी २०२३/प्र.क्र. ३८/ ई-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०४ मार्च, २०२४.

**संदर्भ**:- १) जिल्हाधिकारी, नागपूर यांचे पत्र क्र.२०२२/सा.प्र/प्रशासन/जि.अ.का./इमारत/ त.म.का. अंदाजपत्र/कावि-३६४,दि. २९/१२/२०२२.
२)शासनाचा समक्रमांकाचा दि. ०२ मार्च,२०२३ रोजीचा शासन निर्णय.
३) जिल्हाधिकारी, नागपूर यांचे पत्र क्र.जि.ना/कार्या-१०/साआर-/का.वि६५४/२०२३ दि. २९/११/२०२३.

**प्रस्तावना:-**

उपरोक्त संदर्भाधिन क्र. १ येथील पत्रान्वये नागपूर येथे विभागीय आयुक्त कार्यालय, जिल्हाधिकारी कार्यालय, उपविभागीय अधिकारी, नागपूर शहर कार्यालय व तहसिल कार्यालय, नागपूर शहर यासोबतच इतर शासकीय कार्यालयांचा समावेश असलेल्या एकत्रित इमारतीचे बांधकाम करण्यासाठीच्या रु. २७१३३.८४ लक्ष इतक्या किंमतीचे बांधकाम प्रचलित पध्दतीनुसार सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत करण्यासाठी संदर्भ क्र. ०२ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

२. तथापि, सदर इमारत जिल्हाधिकारी,नागपूर यांच्या दि. निरंकच्या पत्रान्वये महामेट्रो यांच्या मार्फत ठेव व अंशदान तत्वावर करण्याची बाब विचाराधिन असतांना संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये उक्त G+११ अशा एकत्रित इमारतीचे बांधकाम सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिपत्याखालील महाराष्ट्र राज्य पायाभूत सुविधा विकास महामंडळ मर्या. मुंबई यांच्यामार्फत करण्याची विनंती जिल्हाधिकारी,नागपूर यांच्याकडून करण्यात आली. उक्त विनंतीच्या अनुषंगाने उपरोक्त दि.०२/०३/२०२३ रोजीचा शासन निर्णय अधिक्रमीत करून सदर इमारत बांधकाम प्रस्ताव महाराष्ट्र राज्य पायाभूत सुविधा विकास महामंडळ मर्यादित यांच्यामार्फत "ठेव व अंशदान" तत्वावर करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

सदर इमारत बांधकामाची किंमत रू.१५ कोटी पेक्षा अधिक असल्याने सदर प्रस्ताव दि.२४/०२/२०२३ रोजीच्या उच्चस्तरीय समितीद्वारे मान्यता देण्यात आल्यानुसार **इमारतीचे जोते क्षेत्रफळ कर्मचारी वर्ग यांच्या अनुज्ञेय मानकाप्रमाणे असल्याची खातरजमा करण्याच्या अटीच्या अधिन राहून तसेच सविस्तर नकाशांना उपभोक्ता विभागाने मान्य करुन अभिलेख्यावर घेण्याचे अटीसह अंदाजित रु.२७१.३४ कोटी इतक्या रक्कमेस यापूर्वीच सहमती दर्शवण्यात आली आहे.**

आता नागपूर येथे विभागीय आयुक्त कार्यालय, जिल्हाधिकारी कार्यालय, उपविभागीय अधिकारी, नागपूर शहर यांचे कार्यालय व तहसिल कार्यालय, नागपूर शहर समवेत इतर शासकीय कार्यालयांचा समावेश असलेल्या एकत्रित इमारतीचे बांधकाम करण्यासाठीच्या रु. २७१३३.८४ लक्ष इतक्या रकमेचे उक्त इमारत बांधकाम पुढील अटींच्या अधीन राहून महाराष्ट्र राज्य पायाभूत सुविधा विकास महामंडळ मर्यादित यांच्यामार्फत "ठेव व अंशदान" तत्वावर करण्यास शासन खालील अटींच्या अधिनतेने प्रशासकीय मान्यता प्रदान करीत आहे.

**अटी व शर्ती -**

१) विषयांकित काम खाजगी वास्तुशास्त्रज्ञ यांनी तयार केलेल्या नकाशावर आधारीत असल्याने जिल्हाधिकारी,नागपूर यांच्यामार्फत सदर नकाशास मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सा.बां.विभाग, मुंबई यांची सहमती/स्वाक्षांकन प्राप्त करुन घेण्यात यावे. तसेच अंदाजपत्रकातील विविध कक्षांचे क्षेत्रफळ विहित निकषांनूसार तसेच आवश्यकतेनुसार आहे किंवा कसे, याबाबत मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, मुंबई यांच्याकडून जिल्हाधिकारी, नागपूर यांच्यामार्फत खातरजमा करण्यात यावी.

२) सदर बांधकामाच्या सविस्तर अंदाजपत्रकास मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांच्याकडून जिल्हाधिकारी,नागपूर यांच्यामार्फत तांत्रिक मान्यता प्राप्त करुन घेणे व सदर काम सा.बां. विभागाव्यतिरिक्त अन्य यंत्रणेमार्फत करण्यात येत असल्याने सदर प्रकरणी तांत्रिक मान्यता देण्याकरिता प्रकल्प किंमतीच्या १.२५ टक्के इतके शुल्क सार्वजनिक बांधकाम विभाग यांना अदा करणे महाराष्ट्र राज्य पायाभूत सुविधा महामंडळ मर्या. यांना बंधनकारक असेल.

४) राज्य शासनाच्या अर्थसंकल्पात समाविष्ट करण्यासाठी सार्वजनिक बांधकाम विभागाप्रमाणेच महाराष्ट्र राज्य पायाभूत सुविधा महामंडळ मर्या. यांचेकडून कोणतेही वेगळे स्वतंत्र शुल्क, सेटेंज चार्जेस आकारण्यात येऊ नयेत.

५) मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकारी समितीने मान्यता दिल्यानुसार प्रस्तावित इमारतीचे जोते क्षेत्रफळ कर्मचारी वर्ग यांच्या अनुज्ञेय मानकाप्रमाणे असल्याची खातरजमा जिल्हाधिकारी,नागपूर यांचेमार्फत करण्यात यावी.

६) याशिवाय सदर इमारत बांधकामाच्या अनुषंगाने निधीची तरतूद करणे, वितरीत निधीवर नियंत्रण ठेवणे,खर्चाचा मेळ घालणे, लेखे तपासणे, महालेखापालांकडील लेखा परिक्षण करणे तद्नंतर लोकलेखा समिती पुढील साक्ष इत्यादी बाबीसाठीची जबाबदारी विभागीय आयुक्त नागपूर यांच्यामार्फत जिल्हाधिकारी,नागपूर यांची राहील. याकरीता आवश्यक ते सहाय्य करण्याची जबाबादारी महाराष्ट्र राज्य पायाभूत सुविधा महामंडळ मर्या. यांची राहील.

**इतर सर्वसाधारण अटी व शर्ती :**

१) सदर कामास प्रशासकीय मान्यता देण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची खातरजमा जिल्हाधिकारी,नागपूर यांचेमार्फत करण्यात यावी.

२) प्रस्तुत काम पुरातत्व विभागाच्या अखत्यारीत येत असल्यास संबंधित विभागाची तसेच महानगरपालिका व तत्सम प्राधिकरणे यांची पूर्व परवानगी घेण्यात यावी.

३) प्रस्तुत इमारत बांधकामाच्या अनुांगाने तांत्रिक मंजूरी घेतांना राज्य दरसूचीबाह्य बाबींच्या दराकरीता शासन परिपत्रक क्रमांक २०१७/ प्र.क्र.११/ नियोजन-३, दि. ११/०४/२०१७ नुसार कार्यवाही करण्यात यावी.

४) उक्त बांधकामाच्या अनुषंगाने प्रस्तावातील खरेदीशी संबंधीत बाबींकरिता ई-निविदा प्रणालीचा अवलंब करुन उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाकडील दि. २४/०८/२०१७ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या सूचना विचारात घेणे बंधनकारक राहील.

५) प्रत्यक्ष सदरचे बांधकाम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क., दि.१० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

६) उक्त इमारतीच्या स्थापत्य कामाच्या कालावधीतच विद्युतीकरणाबाबत तसेच इतर अनुषंगिक कामांचे योग्य नियोजन करुन सदर कामे पूर्ण करावीत.

७) सदर इमारतीमध्ये दिव्यांगाकरीता उपलब्ध करुन द्यावयाच्या विविध सोयींबाबत शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यात यावी.

८) विषयांकीत बांधकामांकरीता सुधारीत प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही, याद्दष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

**३.** सर्वसाधारणपणे सार्वजनिक बांधकाम विभागाने उपरोक्तप्रमाणे निश्चित केलेल्या अटी व शर्ती तसेच उच्चस्तरिय समितीच्या अटी व शर्तींच्या अधिन राहून सदर इमारत बांधकाम महाराष्ट्र राज्य मुलभूत सुविधा विकास महामंडळ मर्यादित मुंबई मार्फत करण्यास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**४.** सदर इमारत बांधकामासाठी येणारा खर्च लेखाशिर्ष "मागणी क्रमांक एच-८ ४०५९ - सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च ०१ कार्यालयीन इमारती ०५१, बांधकाम (०७) जिल्हा प्रशासन (योजनांतर्गत) ५३, मोठी बांधकामे (०७)(०१) मोठी बांधकामे (४०५९ ०७९९) (०७)(०२) आस्थापना खर्च (४०५९ ०८०५) (०७)(०३) हत्यारे व संयंत्र यांचा खर्च (४०५९ ०८१४)" या उद्दिष्टाखाली उपलब्ध असलेल्या अर्थसंकल्पीय अनुदानामधून भागविण्यात यावा.

**५.** सदर शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक-विअप्र-२०१३/प्र.क्र.-३०/ १३/विनियम, भाग-२, दिनांक १७/०४/२०१५ मधील भाग- पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक १ नियम क्र. १३४ अन्वये प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार आणि दि.२४/०२/२०२३ रोजी झालेल्या उच्चाधिकार समितीच्या बैठकीमध्ये मान्यता दिल्यानुसार तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२९/इमा-३, दि.१४/०२/२०२३ च्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२४०३०५११३३३४८६१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

SHRIRAM DATTATRAYA YADAV

Digitally signed by SHRIRAM DATTATRAYA YADAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=9da0e03bd84c1e17d78ad320814d003150fbf7d2abd36f924e5705145bf0e270, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=50CB0CE4CC4FE54C74F42B860354E86EC00B3B36F5F215C9F7658E611006A200, cn=SHRIRAM DATTATRAYA YADAV
Date: 2024.03.05 12:31:32 +05'30'

**( श्रीराम यादव )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
२. जिल्हाधिकारी, नागपूर
३. व्यवस्थापकीय संचालक महाराष्ट्र राज्य मुलभूत सुविधा विकास महामंडळ मर्या. मुंबई
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, नागपूर.
५. महालेखापाल (लेखा परिक्षा)-१/२, महाराष्ट्र, नागपूर.
६. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा- नागपूर.
८. सह सचिव/ उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-३), मंत्रालय, मुंबई-३२.
९. सह सचिव/ उप सचिव, नियोजन विभाग, कार्यासन-१४७५, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. सह सचिव/ उप सचिव, वित्त विभाग, (व्यय-९), मंत्रालय, मुंबई-३२.
११. निवड नस्ती, (कार्यासन ई-८), महसूल व वन विभाग, मुंबई-३२.